**इतर मागासवर्ग व सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती, व विशेष मागास प्रवर्ग कल्याण या विभागासाठी एक सह सचिव आणि एक उप सचिव संवर्गाची पदे नव्याने निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इमाव, साशैमाप्र,विजाभज व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्र.आस्थाप्र -२०१९/प्र.क्र.८४/आस्थापना**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ जानेवारी, २०२०.

वाचा:-

१. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.शाकानि-२०१७/प्र.क्र.३३/१८(रवका), दि.०९.०३.२०१७
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.१९७/आस्था-१, दि.०९.०६.२०१७.
३. शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.११/आस्था-१, दि.०६.१२.२०१७.
४. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.२६४/आस्था-१, दि.२५.०६.२०१९.
५. शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, क्र. आस्थाप्र-२०१९/ प्र.क्र.८४ / आस्थापना, दि. २२ ऑगस्ट, २०१९
६. सह सचिव तथा सदस्य सचिव उच्चस्तरीय समिती वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र. पदनी-२०१९/प्र.क्र.६५/१९/आपुक
७. शासन निर्णय, इमाव, साशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग क्र.आस्थाप्र-२०१९/ प्र.क्र.७०/ आस्थापना, दि.१३ सप्टेंबर, २०१९

प्रस्तावना:-

इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग या नवनिर्मित विभागाच्या कामाचे स्वरुप पाहता या विभागासाठी नवीन पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव विभागाच्या विचाराधीन आहे. विभागाची तातडीची गरज लक्षात घेता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने दि.१३.०८.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत एक उप सचिव संवर्गातील पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. मा.मुख्य सचिव यांच्या

अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने मान्यता दिल्यानुसार सदरहू उप सचिव संवर्गाचे पद निर्माण करण्याचा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला. मा.मंत्रिमंडळाने दि.२०.०८.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत या विभागासाठी उप सचिव संवर्गाचे एक पद निर्माण करण्यास मान्यता दिली असून, याबाबतचा शासन निर्णय दि.२२.०८.२०१९ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

२. या विभागासाठी आवश्यक असणाऱ्या ३७ पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव मा.उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. मा.उच्चस्तरीय समितीने दि.२९.०८.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत या विभागाकरिता खालील पदे मंजूर करण्याचा निर्णय दि. १३ सप्टेंबर, २०१९ अन्वये घेतला आहे:-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | सह सचिव | एस-२७ (१,१८,५००-२,१४,१००) | १ |
| २ | उप सचिव | एस-२५ (७८,८००-२,०९,२००) | १ |
| ३ | अवर सचिव | एस-२३ (६७,७००-२,०८,७००) | ४ |
| ४ | अवर सचिव (विधी) | एस-२३ (६७,७००-२,०८,७००) | २ |
| ५ | कक्ष अधिकारी | एस-१७ (४७,६००-१,५१,१००) | ८ |
| ६ | सहायक कक्ष अधिकारी | एस-१४ (३८,६००-१,२२,८००) | ६ |
| ७ | लिपिक टंकलेखक | एस-६ (१९,९००-६३,२००) | ८ |
| ८ | उच्चश्रेणी लघुलेखक | एस-१५ (४१,८००-१,३२,३००) | २ |
| ९ | निम्नश्रेणी लघुलेखक | एस-१४ (३८,६००-१,२२,८००) | २ |
| १० | लेखाधिकारी | एस-१६ (४४,९००-१,४२,४००) | १ |
| एकूण पदे | | | ३५ |

तसेच खालील सेवा त्यापुढे दर्शविलेल्या मनुष्यबळाच्या मर्यादेत बाह्यस्त्रोताद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | सेवा | मनुष्य दिवस |
|---|---|---|
| १ | वाहन चालक | १ |
| २ | शिपाई | १ |

वरीलप्रमाणे नियमित ३५ व बाह्यस्त्रोताद्वारे सेवा उलपब्ध करुन घेण्यासाठी २ असे एकूण ३७ पदे नव्याने निर्माण करण्यास मा.उच्चस्तरीय समितीने मान्यता दिली आहे.

३. मा.उच्चस्तरीय समितीच्या सूचना क्र.१ नुसार नवीन पदे निर्मितीच्या प्रस्तावामध्ये ग्रेड वेतन रु.७,६००/- किंवा त्यापेक्षा जास्त वेतनाची पदे असतील असे प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी विभागाने सादर करावे, अशा सूचना आहेत. त्यानुसार प्रस्ताव मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. दि. २२/०१/२०२० रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत या विभागासाठी सह सचिव संवर्गातील एक पद आणि उप सचिव संवर्गातील एक पद मंजूर करण्यास मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय** :-

मा.मंत्रीमंडळाने दि.२२/०१/२०२० रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार सह सचिव वेतन श्रेणी एस-२७ (रु.१,१८,५००- २,१४,१००) संवर्गातील एक पद आणि उप सचिव वेतन श्रेणी एस-२५ (रु ७८,८००-२,०९,२००) या संवर्गातील एक पद निर्माण करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे. यासाठी येणारा खर्च विभागाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर पदे भरण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाने करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००१२२१७५६५२३५२२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.01.22 17:57:54 +05'30'

(भा.र.गावित)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री/राज्यमंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, विधान भवन, मुंबई
५. सर्व विधान परिषद/ विधानसभा सदस्य, विधान भवन, मुंबई
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अप्पर मुख्य सचिव (वित्त) सामान्य प्रशास विभाग, मंत्रालय, मुंबई

८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
९. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
१०.महालेखापाल-१ (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई
११.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२.प्रधान सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
१५.सह सचिव/ उप सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक
१६.सर्व कक्ष अधिकारी, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.वित्त विभाग (व्यय-१५/आ.पु.क), मंत्रालय, मुंबई
१८. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१४), मंत्रालय, मुंबई
१९.निवडनस्ती (आस्था-१)